वितरण आदेश क्र.११
सन २०१४-१५

राज्य प्रशिक्षण धोरणांतर्गत मंजूर तरतूदीमधून राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा या कक्षास, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेने सन २०१४-१५ या आर्थिक वर्षात प्रबोधिनीमध्ये घेतलेल्या प्रशिक्षणाकरिता, प्रशिक्षण शुल्क उपलब्ध करुन द्यावयाच्या सहायक अनुदानास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देणेबाबत. (सन २०१४-१५ योजनांतर्गत)

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : टीआरएन -२०१४/प्र.क्र.१११/१४/१२-अ,**
हुतात्मा राजगुरू चौक,मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक - ३१ मार्च ,२०१५

संदर्भ :- १. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी२०१४/प्र.क्र.९१/२०१४/२५, दि.९ एप्रिल, २०१४
२.वित्त विभाग परिपत्रक क्र.अर्थसं-२०१४/प्र.क्र.६६/अर्थसंकल्प-३, दि.१७.४.२०१४.
३. वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज/२०१४ प्र .क्र.११०/अर्थसंकल्प-३, दि.१ जुलै २०१४
४.सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय सम क्रमांक दि.२०.५.२०१४
५. सामान्य प्रशासन विभाग,शासन परिपत्रक क्र.बीयुडी२०१४/प्रक्र९१/२०१४/२५, दि. ३ जुलै, २०१४
६.वित्त विभाग, परिपत्रक क्र. अंदाज/२०१३ प्र .क्र.८५/अर्थसंकल्प,३ दि.२ जानेवारी २०१५ व दि.९ फेब्रुवारी, २०१५
७. वि.का.अ., डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती यांचे क्र.वि.प्र.वि.प्र./प्र.व.लि./अनुदान/३१२/२०१४-१५ दि.१७.३.२०१५ चे पत्र.
८. सामान्य प्रशासन विभाग शासन निर्णय क्रमांक टीआरएन -२०१४/१५६२/प्र.क्र.२४२/१४/१२-अ, दि.२६.३.२०१५.
९. सामान्य प्रशासन विभाग, शासन निर्णय सम क्रमांक दि.२७.३.२०१५.
१०. सामान्य प्रशासन विभाग,शासन निर्णय क्रमांक टीआरएन-२०१४/१३९०/प्र.क्र.२०३/१४/१२-अ, दिनांक ३१ मार्च,२०१५.

प्रस्तावना :-

महाराष्ट्र राज्याचे प्रशिक्षण धोरण मंत्रीमंडळाच्या मान्यतेने दि.२३.९.२०११ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आले आहे. सदर धोरणाच्या अंमलबजावणीसाठी **“ मागणी क्र. ए-०४, २०७०-इतर प्रशासकीय सेवा ००३-प्रशिक्षण (००)(१०) राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय्य यावरील खर्च (२०७० ०८५३) ३१-सहायक अनुदान ”** योजनांतर्गत या लेखाशिर्षाखाली सन २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता एकूण रु.१०४९.९९ लाख इतकी तरतूद अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये करण्यात आली असून तरतूदीच्या अनुषंगाने, एप्रिल ते जुलै, २०१४ या ४ महिन्यांसाठी एकूण रु.३५०.०० लाख एवढे लेखा अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले होते. त्यापैकी संदर्भाधीन क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये **रामेती पुणे, नाशिक प्रबोधिनी व वनामती, नागपूर या संस्थांना अनुक्रमे रु. ६५.००/- लाख,रु. ६२.००/- लाख व रु. ५३.०५/- लाख असे एकूण रु.१,८०,०५,०००/-** ( रुपये एक कोटी, ऐंशी लाख, पाच हजार फक्त ) एवढ्या योजनेतर सहायक अनुदानास प्रशासकीय व वित्तीय मान्यता देऊन, निधी वितरित करण्यात आला आहे. आता संदर्भाधीन क्र. ५ च्या परिपत्रकान्वये अर्थसंकल्पीय अंदाजामध्ये केलेल्या

तरतूदीच्या अनुषंगाने संपूर्ण अनुदान नियंत्रक अधिकाऱ्यांच्या स्वाधिन करण्यात आले आहे. संदर्भाधीन क्र. ६ च्या परिपत्रकानुसार एकूण अर्थसंकल्पीय अनुदानाच्या ७५% च्या मर्यादेत, **रु.७,८७,४९,०००/-** इतके सहायक अनुदान अर्थसंकल्प वितरण प्रणालीवर उपलब्ध करुन देण्यात आले आहे. सदर तरतूदीपैकी रु.२४८.४३ लाख एवढी तरतूद उपलब्ध करुन देण्याचे वि.का.अ.,डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती,यांनी संदर्भाधीन क्र. ७ पत्राव्दारे प्रस्तावित केले आहे. तथापि,या लेखाशिर्षाखाली, यशदा पुणे यांना रु. ४,१९,७५,०००/- , नाशिक महसूल प्रबोधिनी,या संस्थेस रु.२८,१९,७००/-, वनामती नागपूर या संस्थेस रु. १,१२,६६,५४३ /- रामेती खोपोली, या संस्थेस रु.३६,१२,६७१ /- असे एकूण रुपये ७,७६,७८,९१४/- इतका निधी (२०७० ०८५३ ) या लेखाशिर्षाखाली निधी वितरित करण्यात आला आहे. **सदर तरतूदीपैकी रु.१०,७०,०८६/- इतका निधी (२०७० ०८५३ ) या लेखाशिर्षाखाली वितरित करण्याकरिता उपलब्ध होत आहे. त्या अनुषंगाने** डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती यांना प्रबोधिनीमध्ये राज्य प्रशिक्षण धोरणान्वये पायाभूत प्रशिक्षण, उजळणी व पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण, या प्रशासकीय प्रशिक्षणाच्या शुल्काकरिता प्रशासकीय व वित्तीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय:-**

राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणेअंतर्गत आता सदर अनुदानाच्या मर्यादेत डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती या संस्थेस प्रबोधिनीमध्ये राज्य प्रशिक्षण धोरणान्वये वर्ग-२ व वर्ग-३ च्या अधिकारी / कर्मचारी यांचे सन २०१४-१५ या आर्थिक वर्षामध्ये घेतलेल्या पायाभूत प्रशिक्षण, उजळणी व पदोन्नतीनंतरचे प्रशिक्षण, या प्रशासकीय प्रशिक्षणाच्या शुल्काकरिता **रु.१०,७०,०८६/- ( रुपये दहा लाख, सत्तर हजार, सहाऐंशी फक्त )** इतक्या खर्चास वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८, भाग पहिला, उपविभाग-तीन, अ.क्र.२७ (२) अन्वये प्रशासनिक विभागास प्रदान करण्यात आलेल्या शक्तींचा वापर करुन व सदर अधिकारातील रकाना क्र.६ खालील अटींच्या आधारे राहून प्रशासकिय व वित्तीय मान्यता देण्यात येत आहे.

२. यासाठी होणारा **रु.१०,७०,०८६/- ( रुपये दहा लाख, सत्तर हजार,सहाऐंशी फक्त )** इतका खर्च **"मागणी क्र. ए-०४ ,२०७०-इतर प्रशासकीय सेवा ००३-प्रशिक्षण (००)(१०)- राज्य प्रशिक्षण कार्यक्रम राबविण्यासाठी विविध सुविधा व सहाय्य यावरील खर्च (२०७० ०८५३) ३१-सहायक अनुदान"** या लेखाशीर्षाखाली २०१४-२०१५ या आर्थिक वर्षाच्या मंजूर तरतूदीमधून भागविण्यात यावा.

३. सदरहू मंजूर करण्यात आलेले अनुदान तात्काळ कोषागारातून आहरित करुन सदर अनुदानाची संबंधित कोषागारातून काढण्यात आलेली रक्कम महालेखापाल कार्यालयातील लेख्यात त्याच शीर्षाखाली नोंदली गेली आहे किंवा नाही याची खात्री करुन घ्यावी व त्याबाबतचे प्रमाणपत्र १५ दिवसांच्या आत शासनास सादर करावे.

४. संस्थेने आता वितरीत करण्यात येत असलेल्या अनुदानाचे विनियोग प्रमाणपत्र (UTILIZATION CERTIFICATE) महालेखापाल, लेखा परीक्षा, महाराष्ट्र-१, मुंबई व शासनाला सदर विनियोग प्रमाणपत्रात बाबनिहाय तपशीलवार खर्चाची नोंद घेऊन तातडीने सादर करावे.

५. यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी, पुणे या संस्थेने, उपरोक्त अनुदानामधून केलेल्या खर्चाचे स्वतंत्र लेखे व पुस्तके तपासण्याचे अधिकार, महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई यांना राहतील व त्याकरिता सदर संस्था त्यांना संपूर्ण सुविधा उपलब्ध करुन देईल.

६. संस्थेने आर्थिक वर्ष २०१४-२०१५ मधील खर्च मंजूर अनुदानाइतका सिमित ठेवावा.

७. प्रस्तुत शासन निर्णय संदर्भाधीन क्र.६ च्या वित्त विभागाच्या दि.९ फेब्रुवारी,२०१५ च्या शासन परिपत्रकातील परिच्छेद २ मध्ये नमूद केलेल्या निकषांच्या अधीन राहून निर्गमित करण्यात येत आहे .

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०३३१२२०९१०७६०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

PATIL PRATIBHA MADHAV

Digitally signed by PATIL PRATIBHA MADHAV
DN: CN = PATIL PRATIBHA MADHAV, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = GAD,CID - 916982
Date: 2015.03.31 22:21:26 +05'30'

**( प्रतिभा मा. पाटील )**
**कार्यासन अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग.**

**प्रति,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई-०१.
२. मा.अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
४. मा. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
५. मा.प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
६. महासंचालक, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
७. उपमहासंचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
८. संचालक, राज्य प्रशिक्षण नियंत्रण व मूल्यमापन यंत्रणा, यशदा, राजभवन आवार, बाणेर रोड, पुणे.
९. विशेष कार्य अधिकारी, डॉ.पंजाबराव देशमुख विदर्भ प्रशासकीय व विकास प्रशिक्षण प्रबोधिनी, अमरावती.
१०.लेखाधिकारी,यशदा,पुणे.
११. नियोजन विभाग, ( कार्यासन १४४३ ) वित्त विभाग (व्यय-४/अर्थसंकल्प-१४), मंत्रालय, मुंबई-३२.
१२. अवर सचिव, सामान्य प्रशासन विभाग/का.क्र.२५.
१३. निवड नस्ती.